पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयम् योजना.

# महाराष्ट्र शासन

**आदिवासी विकास विभाग,**

**शासन निर्णय-क्र.आवगृ-२०१६/प्र.क्र.८७/का-१२**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दि. २७ नोव्हेंबर, २०१८.

<u>वाचा</u> :- १. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र. आवगृ-२०१६/प्र.क्र.८७/का-१२, दि.१५.१०.२०१६.

२. आदिवासी विकास विभाग, शासन शुद्धीपत्रक, क्र. आवगृ-२०१६/प्र.क्र.८७/का-१२, दि.०५.१०.२०१८.

**प्रस्तावना :-**

दि.१५.१०.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षापासून विभागाच्या कार्यान्वित शासकीय वसतीगृहात प्रवेश न मिळालेल्या एकूण २०,००० विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाकरीता भोजन, निवास व शैक्षणिक साहित्यासाठी त्यांच्या आधारसंलग्न बँक खात्यामध्ये थेट रक्कम वितरण करण्याबाबत पंडीत दीनदयाल उपाध्याय स्वयम् योजना सुरू करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत महानगरपालिका, विभागीय शहरे आणि जिल्हास्तरावरील शैक्षणिक संस्थांमध्ये प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना निवास भत्ता, आहार भत्ता, निर्वाह भत्ता तसेच शैक्षणिक साहित्य उपलब्ध करून घेण्याकरिता निर्धारीत केलेले अर्थसहाय्य देण्यात येते. त्याचप्रमाणे दि.०५.१०.२०१८ रोजीच्या शुद्धीपत्रकान्वये काही सुधारणा करण्यात आल्या आहेत.

तथापि, योजना सुरू झाल्यापासून योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या अर्जांच्या तुलनेत प्रत्यक्ष लाभार्थी संख्येचे प्रमाण अत्यंत कमी दिसून येत आहे. त्याप्रमाणे योजनेंतर्गत अर्ज मंजूर करण्याचे टप्पे अधिक असल्याने अर्ज मंजूर करण्यास अधिक कालावधी लागतो. त्यानुषंगाने योजनेच्या अटी शर्तीमध्ये सुधारणा करण्याबाबतची बाब तसेच विभागांतर्गत कार्यरत एकूण ४९१ वसतीगृहांपैकी तालुकास्तरावर २७२ एवढी वसतीगृहे कार्यान्वित असून सद्यस्थितीत बऱ्याच तालुक्याच्या ठिकाणी जिल्हास्तरासारख्याच शैक्षणिक सुविधा उपलब्ध असल्याने तालुकास्तरावरील शैक्षणिक संस्थांमध्ये शिक्षण घेत असलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांची संख्या वाढलेली आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेता, योजनेंतर्गत जास्तीत जास्त विद्यार्थ्यांना लाभ देण्याच्या अनुषंगाने तसेच निवासी व शैक्षणिक सुविधांपासून आदिवासी विद्यार्थी वंचीत राहू नये म्हणून पंडीत दीनदयाल उपाध्याय स्वयम् योजनेंतर्गत तालुकास्तराचा देखील समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याकरिता सद्यस्थितीत प्रचलित संदर्भ क्र.१ व २ येथील शासन निर्णय अधिक्रमित करून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सद्यस्थितीत महानगरपालिका, विभागीय शहरे आणि जिल्हास्तरावर सुरू असलेल्या स्वयम् योजनेबरोबरच सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षापासून तालुकास्तरावरील इ.१२ वी नंतरच्या

मान्यताप्राप्त तंत्र शिक्षण तसेच व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रमाच्या महाविद्यालयामध्ये केंद्रिभूत प्रवेश प्रक्रियेद्वारे प्रवेश घेतलेल्या परंतु शासकीय वसतीगृहामध्ये प्रवेश न मिळालेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना "पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयम् योजना" या योजनेंतर्गत भोजन, निवास व इतर शैक्षणिक साहीत्य उपलब्ध करुन घेण्यासाठी विद्यार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यामध्ये थेट रक्कम वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजना महानगरपालिका, विभागीय शहरे आणि जिल्हास्तरावरील सर्व शैक्षणिक संस्थांमध्ये प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना तसेच तालुकास्तरावरील सर्व मान्यताप्राप्त तंत्र शिक्षण तसेच व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रमाच्या शासकीय तसेच अनुदानित महाविद्यालयांमध्ये केंद्रिभूत प्रवेश प्रक्रियेद्वारे प्रवेश घेऊन शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना लागू राहील.

३. सदर योजनेंतर्गत आदिवासी विकास विभागाच्या शासकीय वसतीगृहामध्ये प्रवेश घेणे किंवा थेट अनुज्ञेय रक्कमेचा लाभ घेणे हे दोन पर्याय विद्यार्थ्यांकडे उपलब्ध राहणार आहेत. सबब शासकीय वसतीगृहातील सद्याची एकूण मंजूर विद्यार्थी क्षमता ६१,०७० व स्वयम् योजनेंतर्गतची क्षमता २०,००० अशा एकूण ८१,०७० इतक्या क्षमतेच्या ५० टक्केच्या कमाल मर्यादेत विद्यार्थ्यांना पसंतीनुसार व गुणानुक्रमाने थेट रक्कम योजनेचा लाभ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. खालील प्रकारच्या क्षेत्रनिहाय शैक्षणिक संस्थांमध्ये प्रवेश मिळालेल्या तथापि, शासकीय वसतीगृहात प्रवेशित नसलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इ. १२ वी नंतरचे उच्च शिक्षण घेण्याकरिता वार्षिक खर्चासाठी खालीलप्रमाणे निश्चित केलेनुसार विद्यार्थ्याच्या आधार संलग्न बँक खात्यामध्ये थेट रक्कम वितरण करण्यात यावी.

| **अ.क्र** | **खर्चाची बाब** | **मुंबई शहर, मुंबई उपनगर, नवी मुंबई, ठाणे, पुणे, पिंपरी-चिंचवड, नागपूर या ठिकाणी उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यासाठी अनुज्ञेय रक्कम** | **इतर महसुली विभागीय शहरातील व उर्वरित क वर्ग महानगरपालिका क्षेत्रामध्ये उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यासाठी अनुज्ञेय रक्कम** | **इतर जिल्ह्याचे ठिकाणी उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यासाठी अनुज्ञेय रक्कम** | **तालुका ठिकाणी उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यासाठी अनुज्ञेय रक्कम** |
|---|---|---|---|---|---|
| १ | भोजन भत्ता | ३२,००० | २८,००० | २५,००० | २३,००० |
| २ | निवास भत्ता | २०,००० | १५,००० | १२,००० | १०,००० |
| ३ | निर्वाह भत्ता | ८,००० | ८,००० | ६,००० | ५,००० |
| | **प्रती विद्यार्थी एकूण संभाव्य वार्षीक खर्च** | **६०,०००** | **५१,०००** | **४३,०००** | **३८,०००** |

**टीप** - वरील रक्कमे व्यतिरिक्त वैद्यकीय व अभियांत्रिकी शाखेतील विद्यार्थ्यांसाठी प्रतिवर्ष रु.५,०००/- व अन्य शाखेतील विद्यार्थ्यांना प्रतिवर्षी रु.२,०००/ इतकी रक्कम शैक्षणिक साहित्यासाठी ठोक स्वरुपात देण्यात येंईल.

**५. सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी खालीलप्रमाणे निकष असतील.**

**अ) मुलभूत पात्रता**

i. विद्यार्थी अनुसूचित जमातीचा असावा. विद्यार्थ्यांने अर्जासोबत जात प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील.

ii. विद्यार्थ्याच्या पालकाचे उत्पन्न रु.२.५० लाख पेक्षा जास्त नसावे. तसेच केंद्र शासनामार्फत ज्या ज्या वेळी मॅट्रीकेत्तर शिष्यवृत्तीसाठी उत्पन्न मर्यादेत वाढ होईल, त्यानुसार या योजनेसाठी पालकाची वार्षीक उत्पन्न मर्यादा लागू राहील.

iii. विद्यार्थ्याने स्वत:चा आधार क्रमांक आपले राष्ट्रीयकृत बँक खात्याशी संल्लग्न करणे बंधनकारक राहील.

iv. विद्यार्थ्याने प्रवेश घेतलेली शैक्षणिक संस्था ज्या शहराच्या/तालुक्याच्या ठिकाणी आहे अशा शहरातील सदर विद्यार्थी रहिवाशी नसावा.

**ब) शैक्षणिक निकष**

i. सदरचा विद्यार्थी १२ वी नंतरचे उच्च शिक्षण घेत असावा.

ii. केंद्र शासनाच्या पोस्ट मॅट्रिक शिष्यवृत्ती करीता निश्चित करण्यात आलेल्या अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना सदर योजनेंतर्गत लाभ देण्यात येईल. तथापि, दोन वर्षापेक्षा कमी कालावधीच्या अभ्यासक्रमासाठी या योजनेचा लाभ मिळणार नाही.

iii. एका शाखेची पदवी किंवा पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी या योजनेचा लाभ घेतल्यानंतर पुन्हा इतर शाखेच्या पदवी किंवा पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांस या योजनेचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

iv. अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, अखिल भारतीय वैद्यकीय परिषद, भारतीय फार्मसी परिषद, वास्तुकला परिषद, राज्य शासन किंवा तत्सम संस्था इ. मार्फत मान्यताप्राप्त महाविद्यालयात/संस्थेमध्ये व मान्यता प्राप्त अभ्यासक्रमासाठी विद्यार्थ्यास प्रवेश मिळालेला असावा.

v. योजनेंतर्गत तालुकास्तरावर लाभ मंजूर करण्यासाठी अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्याने इ.१२ वी नंतरच्या मान्यताप्राप्त तंत्र शिक्षण तसेच व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रमाच्या महाविद्यालयामध्ये केंद्रिभूत प्रवेश प्रक्रियेद्वारे प्रवेश घेतलेला असावा.

vi. योजनेंतर्गत लाभ मिळण्याकरिता विद्यार्थ्याचे महाविद्यालयीन उपस्थितीबाबत स्वयम् पोर्टलवर नोंद घेणे बंधनकारक असणार नाही. तथापि, एखाद्या विद्यार्थ्याच्या उपस्थितीबाबत शंका निर्माण झाल्यास संबंधित महाविद्यालयामध्ये विद्यार्थ्याच्या उपस्थितीबाबत शहानिशा

करून विद्यार्थ्यास देय असलेली रक्कम अदा करण्याबाबत संबंधित प्रकल्प कार्यालयाकडून योग्य तो निर्णय घेण्यात यावा.

vii. विद्यार्थ्यांची निवड गुणवत्तेनुसार करण्यात येईल.

viii. निवड करण्यात आलेल्या विद्यार्थी संबंधित अभ्यासक्रम पूर्ण होईपर्यंत लाभास पात्र राहील. मात्र विद्यार्थ्यास प्रत्येक वर्षी त्या त्या अभ्यासक्रमाच्या परिक्षेत उत्तीर्ण होणे अनिवार्य राहील.

**क) इतर निकष**

i. योजनेचा लाभ १२ वी नंतरचे उच्च शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यास देण्यात येईल. तथापि एका विद्यार्थ्यास जास्तीत जास्त ७ वर्षे सदर योजनेचा लाभ घेता येईल.

ii. सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी विद्यार्थ्यांचे कमाल वय २८ वर्षापेक्षा अधिक नसावे.

iii. अभ्यासक्रमाच्या मध्यावधी कालावधीत प्रवेश घेतलेला विद्यार्थी स्वयम् योजनेंतर्गत लाभास पात्र असेल.

iv. शिक्षणात खंड पडलेला विद्यार्थी स्वयम् योजनेंतर्गत लाभास पात्र असेल. तथापि, सदर विद्यार्थी योजनेंतर्गत निश्चित केलेल्या वयोमर्यादेपेक्षा अधिक वयाचा नसावा.

v. सदर योजनेस पात्र विद्यार्थी अनुत्तीर्ण झाल्यास, अनुत्तीर्ण कालावधीमध्ये योजनेंतर्गत लाभ देण्यात येणार नाही. उत्तीर्ण झाल्यानंतर असा विद्यार्थी लाभास पुढे पात्र राहील. तथापि, उपरोक्त ७ वर्षाचा कालावधी विचारात घेताना उत्तीर्ण व अनुत्तीर्ण असे दोन्ही कालावधींची गणना करण्यात येईल.

vi. योजनेचा लाभ घेण्यासाठी विद्यार्थ्याने आदिवासी विकास विभागाच्या ई-विकास वसतीगृह प्रवेश प्रणालीद्वारे ऑनलाईन अर्ज करणे आवश्यक राहील.

vii. विद्यार्थ्यास आदिवासी विकास विभागाच्या, सामाजिक न्याय विभागाच्या किंवा संबंधित शैक्षणिक संस्थेच्या वसतीगृहामध्ये मोफत प्रवेश मिळालेला नसावा.

viii. विद्यार्थी कोणत्याही प्रकारची नोकरी किंवा व्यवसाय करत नसावा.

ix. आदिम जमातीच्या व अनुसूचित जमातीच्या अपंग विद्यार्थ्यांना सदर योजनेचा लाभ प्राथम्याने देय राहील.

x. विद्यार्थी व शैक्षणिक संस्थांनी सदर योजनेमध्ये फसवणूक केल्याचे आढळल्यास संबंधित विद्यार्थी व शैक्षणिक संस्था कायदेशीर कारवाईस पात्र राहील. तसेच योजनेअंतर्गत लाभ घेणाऱ्या विद्यार्थ्याने शैक्षणिक अभ्यासक्रम पूर्ण न करता लाभ घेणे, शिक्षण न घेता नोकरी /व्यवसाय करुन या योजनेचा लाभ घेऊन गैरवापर केल्याचे निदर्शनास आल्यावर देखील असा विद्यार्थी कारवाईस पात्र राहील व दिलेल्या रकमेची व्याजासह वसुली करण्यात येईल.

xi. सदर योजनेंतर्गत निवड होणाऱ्या विद्यार्थ्यास आहार व निवास सुविधा मोफत उपलब्ध करण्यात येत असल्याने भारत सरकार पोस्ट मॅट्रीक शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत अशा विद्यार्थ्यास निर्वाहभत्ता १/३ या दराने अनुज्ञेय राहील. त्यानुसार अशा पात्र विद्यार्थ्यास केंद्र

शासनाचा अनुज्ञेय १/३ निर्वाह भत्ता प्रथम देण्यात येईल व या योजनेतंर्गत प्रस्तावित निर्वाहभत्त्याची रक्कम व केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय १/३ निर्वाहभत्ता यामधील तफावतीची रक्कम राज्य शासनाच्या या योजनेमधून निर्वाह भत्ता बाबी अंतर्गत देण्यात यावे.

**६. सदर योजनेंतर्गत पात्र विद्यार्थ्यांना खालीलप्रमाणे अनुदान वितरण करण्यात यावे :-**

i. योजनेंतर्गत अनुज्ञेय असलेली भोजन, निवास व निर्वाहभत्त्याची तीन महिन्याची एकत्रित रक्कम पात्र लाभार्थ्याच्या आधार संलग्न बँक खात्यात आयुक्त स्तरावरील मध्यवर्ती खात्यामधून आगाऊ जमा करण्यात यावी. विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात ३ महिन्यांची आगाऊ रक्कम जमा करण्याचे वेळापत्रक साधारणपणे पुढीलप्रमाणे राहील.

| हप्ता | त्रैमासिक कालावधी | रक्कम जमा करण्याचा कालावधी |
|---|---|---|
| पहिला हप्ता | माहे जून ते माहे ऑगस्ट | (ज्या दिवशी विद्यार्थ्याचा / विद्यार्थीनीचा ऑनलाईन अर्ज मंजूर होईल, त्यानंतर ७ दिवसांमध्ये) |
| दुसरा हप्ता | माहे सप्टेंबर ते माहे नोव्हेंबर | माहे ऑगस्टचा दुसरा आठवडा |
| तिसरा हप्ता | माहे डिसेंबर ते माहे फेब्रुवारी | माहे नोव्हेंबरचा दुसरा आठवडा |
| चौथा हप्ता | माहे मार्च ते माहे मे | माहे फेब्रुवारीचा दुसरा आठवडा |

ii. तक्त्यात नमूद वेळापत्रक हे जरी १२ महिन्याचा कालावधी दर्शवित असले तरी प्रस्तुत योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यास एका शैक्षणिक वर्षातील १० महिन्यांच्या कालावधीसाठी लाभ अनुज्ञेय राहील. सदर १० महिन्यांचा लाभ निश्चित करण्याची जबाबदारी संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांची राहील. तथापि, लाभाची रक्कम जमा करताना प्रत्येक तिमाहीमध्ये देय असलेली रक्कम जमा करावी. तसेच पुढच्या ३ महिन्याची रक्कम ही चालू त्रैमासिक कालावधीच्या शेवटच्या महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात जमा करावी, जेणेकरून विद्यार्थ्यास आर्थिक अडचण निर्माण होणार नाही. (उदा. दुसरा त्रैमासिक कालावधी माहे सप्टेंबर ते माहे नोव्हेंबर असा असल्यास सदर कालावधीची रक्कम माहे ऑगस्टच्या दुसऱ्या आठवड्यात जमा करण्यात यावी.)

iii. शैक्षणिक साहित्याकरिता विहित केलेली रक्कम शैक्षणिक वर्षाच्या सुरूवातीला महाविद्यालयात प्रवेश घेतल्याचे प्रमाणपत्र संबंधित विद्यार्थ्याने व शैक्षणिक संस्थेने ऑनलाईन पध्दतीने प्रकल्प कार्यालयास सादर केल्यानंतर एकदाच देण्यात येईल.

iv. योजनेंतर्गत विद्यार्थ्याने अर्ज केल्यानंतर सदर अर्जाची तसेच तद्नुषंगिक कागदपत्रांची तपासणी/पडताळणी करून प्रकल्प अधिकारी स्तरावर अर्जास अंतीम मंजूरी देण्यात येईल.

७. स्वयम् योजनेंतर्गत निश्चित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक अर्ज प्राप्त झाल्यास महानगरस्तर (मोठी शहरे) विभागीयस्तर, जिल्हास्तर व तालुकास्तर याप्रमाणे प्राधान्यक्रम राहील. तालुकास्तरावरील संस्थामधील विद्यार्थ्यांना लाभ देताना पेसा क्षेत्रातील तालुकास्तरावरील संस्थांमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना प्राधान्याने लाभ देण्यात यावा.

८. उपरोक्त सुधारणांच्या अनुषंगाने सद्यस्थितीत कार्यरत संगणकीय प्रणालीमध्ये सुधारणा करण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची राहील.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१६८/व्यय-१४ दि.१८/०९/२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८११२७१५२६३७०७२४ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2018.11.27 15:34:44 +05'30'

**(सु.ना.शिंदे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री , आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री , आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
७. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
८. अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.प्रधान सचिव, कृषि, पशुसंवर्धन, दुगधव्यवसाय व मत्स्यविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.प्रधान सचिव, सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.कुलगुरु, सर्व विद्यापीठे.
१५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
१६.आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१७.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर, अमरावती.
१९.सर्व उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२१.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२२.निवड नस्ती (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.